अर्थसंकल्पिय अनुदान २०२१-२२
संत गाडगेबाबा ग्राम स्वच्छता
अभियानांतर्गत निधी मंजूर/मुक्त
करणेबाबत.

महाराष्ट्रशासन
पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग
शासन निर्णय क्रमांकः संगाग्रा-२०२१/प्र.क्र.२७६/पापु-१६
७ वामजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकुल,
टिळकरोड, मंत्रालय, मुंबई-४०० ००१
तारीखः २५ मार्च, २०२२.

वाचा -

१. पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग शासन निर्णय क्रमांकःसंगाग्रा-२०१९/प्र.क्र.८७/पापु-१६, दिनांक. २३ जुलै, २०१९.
२. पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग शासन निर्णय क्रमांकः संगाग्रा-२०१९/प्र.क्र.८७/पापु-१६, दिनांक. २५ नाव्हेंबर, २०२१.
३. पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग शासन निर्णय क्रमांकःजस्वप्र-१०२०/प्र.क्र.७८/पापु-११, दिनांक ०१ फेब्रुवारी, २०२२.
४. वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक : अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३ दिनांक १४ ऑक्टोबर, २०२१.
५. वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक : अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३ दिनांक ०३ फेब्रुवारी, २०२१.

प्रस्तावना -

ग्रामीण स्वच्छता कार्यक्रमात ग्रामीण जनतेचा उत्स्फूर्त जनसहभाग वाढावा या दृष्टीकोनातून राज्यातील ग्रामीण भागात संत गाडगेबाबा ग्राम स्वच्छता अभियान राबविण्यात येत असून उपरोक्त वाचा १ व २ येथील शासन निर्णयान्वये या अभियानाबाबत सुधारित आदेश निर्गमित करण्यात आले आहेत. या अभियानांतर्गत राष्ट्रसंत तुकडोजी महाराज स्वच्छ ग्राम स्पर्धेतर्गत प्रत्येक ग्राम पंचायतीतील उत्कृष्ट प्रभागाला व जिल्हा परिषद गट स्तर, जिल्हा परिषद स्तर, विभागीय आणि राज्य स्तरावर पात्र ग्राम पंचायतींना पुरस्कार देण्यात येतात. विशेष पुरस्कारांतर्गत पात्र ग्रामपंचायतींना पुरस्कार देण्यात येतात. संत गाडगेबाबा ग्राम स्वच्छता अभियानाची अंमलबजावणी, प्रसिद्धी, तपासणी, दौरे व बक्षीस योजना

इत्यादी करीता सन २०२१-२२ साठी (लेखाशीर्ष २२१५ १९८८खाली) रु.६०००.०० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आलेला होता. सन २०२१-२२ च्या (लेखाशीर्ष २२१५ १९८८खाली) सुधारित अर्थसंकल्पिय अंदाजानुसार रु. ३०००.०० लक्ष (रूपये तीस कोटी) इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आलेला आहे. सदर रु.३०००.०० लक्ष निधी वित्त विभागाकडून बिम्स प्रणालीवर वितरणासाठी उपलब्ध करुन देण्यात आलेला आहे. सदर रु.३०००.०० लक्ष इतका निधी वितरण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

संत गाडगेबाबा ग्राम स्वच्छता अभियानाची अंमलबजावणी, प्रसिद्धी, तपासणी, दौरे व बक्षीस योजना इत्यादी करीता सन २०२१-२२ साठी (लेखाशीर्ष २२१५ १९८८खाली) रु. ६०००.०० लक्ष (रुपये साठ कोटी फक्त) इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आलेला होता. सन २०२१-२२ च्या (लेखाशीर्ष २२१५ १९८८खाली) सुधारित अर्थसंकल्पिय अंदाजानुसार रु. ३०००.०० लक्ष (रूपये तीस कोटी) इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आलेला आहे. सदर निधी वित्त विभागाकडून बीम्स प्रणालीवर वितरणासाठी उपलब्ध करुन देण्यात आलेला आहे. सदर रु.३०००.०० लक्ष (रुपये तीस कोटी फक्त) इतका निधी प्रकल्प संचालक (स्वच्छ भारत मिशन), राज्य पाणी व स्वच्छता मिशन बेलापूर यांच्या अधिनस्त ठेवण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

०२. उपरोक्त प्रमाणे रु.**३०००.०० लक्ष (रुपये तीस कोटी फक्त)** एवढी रक्कम आहरण व संवितरण अधिकारी, सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्ष (जलस्वराज्य प्रकल्प टप्पा-२), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांचेकडे BEAMS प्रणालीवऱ वितरीत करण्यात येत आहे. सदर रक्कम **रु.३०००.०० लक्ष (रुपये तीस कोटी फक्त)** अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई यांच्या कार्यालयातून आहरीत करण्यासाठी वाचा ३ येथील शासन निर्णयानुसार आहरण व संवितरण अधिकारी तथा अवर सचिव (पापु-११), (श्री.अ.नि.धस), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. नियंत्रक अधिकारी म्हणून सहसचिव तथा प्रकल्प संचालक, सुधारणा सहाय्य व

प्रकल्प व्यवस्थापन कक्ष (श्री. अभय महाजन), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. आहरण व संवितरण अधिकारी तथा अवर सचिव (पापु-११), (श्री. अ.नि.धस), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी सदर **रु.३०००.०० लक्ष (रुपये तीस कोटी फक्त)** इतकी रक्कम अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई येथून आहरीत करुन स्वतंत्र धनादेशान्वये प्रकल्प संचालक, (स्वच्छ भारत मिशन) राज्य पाणी व स्वच्छता मिशन, नवी मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

०३. वाचा क्र. १ व २ येथील शासन निर्णयान्वये संत गाडगेबाबा ग्राम स्वच्छता अभियानांतर्गत सन २०१९-२०, सन २०२०-२२ (सन २०२०-२१-२०२२) मधील स्पर्धाच्या पुरस्काराबाबत स्पष्ट निर्देश देण्यात आले आहेत. त्यानुषंगाने प्रकल्प संचालक, (स्वभामि) राज्य पाणी व स्वच्छता मिशन, बेलापूर यांनी संत गाडगेबाबा ग्राम स्वच्छता अभियानासाठी लेखाशिर्ष २२१५ १९८८ अंतर्गत त्यांचे अधिनस्त ठेवण्यात आलेल्या निधीतून संत गाडगेबाबा ग्राम स्वच्छता अभियानांतर्गत सन २०१९-२०, सन २०२०-२२ (सन २०२०-२१-२०२२) मधील स्पर्धाच्या अंमलबजावणी व पुरस्कारासाठी आवश्यक निधी त्यांचे स्तरावरुन जिल्हा परिषदांना वितरीत करावा.

०४. या शासन निर्णयाद्वारे मुक्त केलेली रक्कम पुढील अटींवर मंजूर करण्यात येत आहे.

अ) या निधीतून करण्यात येणारा खर्च जिल्हा परिषदेच्या लेख्यात अनुदान म्हणून वरील लेखाशीर्षात वेगळा ठेवण्यात यावा.

आ) याशासन निर्णयाद्वारे मंजूर केलेले निधी ज्या कारणासाठी मंजूर करण्यात आले आहे त्याच कारणासाठी खर्च करण्यात यावा.

इ) संबंधित जिल्हा परिषदेने/संस्थेने या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेल्या निधीपेक्षा जास्त खर्च करू नये.

ई) अट क्र.४-अ आणि ३-आ यांची पुर्तता झाली आहे याची खात्री करण्यासाठी, महालेखापाल-१, मुंबई व महालेखापाल-२, नागपूर यांच्याकडे जिल्हा परिषदेच्या संबंधित अधिकारी/कर्मचारी यांनी लेखे तपासणीसाठी सर्व कागदपत्रे उपलब्ध करून द्यावीत.

उ) सदर रक्कम राज्य शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचनेप्रमाणे/आदेशाप्रमाणे खर्च करण्यात यावी.

ऊ) ग्रामीण स्वच्छता कार्यक्रमाचा विहित नमून्यातील मासिक प्रगती अहवाल प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत शासनास पाठविण्याची दक्षता घ्यावी. शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचनेप्रमाणे जिल्हा परिषदांनी या अनुदानाच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालावा व ताळमेळाचे अहवाल विहित कालावधीत या विभागातील पापु-०४, पापु-१६ व पापु-२० या कार्यासनांस सादर करावा.

ऋ) सदर रक्कम खर्च करताना वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२१/प्र.क.४८/अर्थ-३ दिनांक २४ जून, २०२१ व शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ दिनांक १४ ऑक्टोबर, २०२१ व दिनांक ३ फेब्रुवारी, २०२२ मधील अटी व शर्तींचे काटेकोरपणे पालन करून आवश्यक बाबींची पूर्तता करून कार्यपूर्ती अहवाल/नमूद प्रमाणपत्रे शासनास त्वरीत सादर करावीत.

ऌ) सदर रक्कम खर्च झाल्यानंतर त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास त्वरित सादर करावे.

०५. हा खर्च "मागणीक्रमांक वाय-०२, २२१५ पाणीपुरवठा व स्वच्छता, ०२ जलनि:स्सारण व स्वच्छता, १०७ मलप्रणालसेवा-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-राज्ययोजना, (०४) संत गाडगेबाबा ग्राम स्वच्छता अभियानाची अंमलबजावणी, (०४) (०५) संत गाडगेबाबा ग्राम स्वच्छता अभियानाची अंमलबजावणी, प्रसिद्धी, तपासणी, दौरे व बक्षीसयोजना ( २२१५ १९८८), २६ जाहिरात व प्रसिद्धी" या लेखाशीर्षाखाली घालावा. सदर अनुदान नियोजन अनौपचारिक संदर्भ क्र.२३७/१४४३, दिनांक

०५/०२/२०२२ व विभागाच्या वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.८५/व्यय-३ दिनांक २१/०३/२०२२ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार सशर्त मंजूर करण्यात येत आहे.

०६. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२१/प्र.क.४८/अर्थ-३ दिनांक. १४ ऑक्टोबर, २०२१ अन्वये या विभागास प्रदान केलेल्या अधिकारात तसेच सदर परिपत्रकातील अटी व शर्तीच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे. सदर शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२१/प्र.क.४८/अर्थ-३ दिनांक १४ ऑक्टोबर, २०२१ व ३ फेब्रुवारी, २०२२ मधील सूचनांचे तसेच दिनांक १४ ऑक्टोबर, २०२१ शासन निर्णयाच्या सोबतच्या परिशिष्टातील अ.क्र.९ येथील तपासणी सुचीतील अ.क्र.१ ते १० मधील लागू असलेल्या अटी व शर्तीची पूर्तता होत असल्याचे प्रमाणीत करण्यात येत आहे.

०७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०३२५१६०३४५३६२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशा नुसार व नावाने.

CHANDRAKANT KRISHNA MORE

Digitally signed by CHANDRAKANT KRISHNA MORE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=11ac200219edb36f7777ee1101657bea4271090267228122b638d6f2cdedad62, pseudonym=268C7E15F99BF8B492638E14751A661EBCF0233F, serialNumber=2314CF333E070F9936792BC95890FA89B2F617A931B2B577B703FA858F3DF433, cn=CHANDRAKANT KRISHNA MORE
Date: 2022.03.25 18:43:57 +05'30'

**( चं.कृ.मोरे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत**

१. मा.मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता )यांचे खासगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता )यांचे खासगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४. विभागीय आयुक्त, सर्व.
५. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ मुंबई/नागपूर (लेखापरीक्षा व अनुज्ञेयता).
६. सह सचिव तथा, पाणीपुरवठावस्वच्छताविभाग, यांचे स्वीय

सहायक, मंत्रालय, मुंबई.

७. उपायुक्त, विकास/आस्थापना, सर्व विभागीय आयुक्त यांचे कार्यालय.

८. जिल्हाधिकारी व सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती सर्व.

९. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हापरिषद, सर्व.

१०. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.

११. मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई/नागपूर.

१२. प्रकल्प संचालक (स्वभामि), राज्य पाणी व स्वच्छता मिशन, बेलापूर, नवीमुंबई.

१३. उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पा. वस्व.), जिल्हापरिषद, सर्व.

१४. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.

१५. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.

१६. कार्यासन क्र.पापु-०४, पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.

१७. निवडनस्ती, कार्यासन पापु-१६, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई